**केंद्र पुरस्कृत योजनांच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी सन२०१०-११ करिता कृति आराखड्यांतर्गत उपलब्ध केलेल्या आकस्मिक बाबीवरील खर्चाच्या निधीस मान्यता देणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**

कृषि,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांक :- कृमास -४११०/प्र.क्र. २०९/३-अे
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २८ सप्टेंबर, २०१०

संदर्भ :- १) केंद्र शासन कृषि मंत्रालयाचे पत्र क्रमांक ६-३/२०१०-एम.एम. दि. ११ जून, २००९.
२) केंद्र शासन कृषि मंत्रालयाचे पत्र क्रमांक ६-६/२०१०-एम.एम. दि. १६ जून, २००९.
३) कृषि आयुक्तालय महाराष्ट्र राज्य पुणे यांचे पत्र क्रमांक -जा.क्र. नियोजन-४/कृआ ३११/ २०१०, दि. २९ जुलै, २०१०.
४) कृषि,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,शासन निर्णय क्रमांक :- कृमास -४११०/प्र.क्र. २०९/३-अे दि. १० ऑगस्ट, २०१०
५) कृषि आयुक्तालय महाराष्ट्र राज्य पुणे यांचे पत्र क्रमांक -जा.क्र. नियोजन-४/कृआ / आ.निधी/ ४०७ / २०१० दि. २१ सप्टेंबर, २०१०

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने सन २०१०-११ करीता केंद्र पुरस्कृत योजनांच्या अंमलबजावणीसाठी कृती आराखडया अंतर्गत रु.९९००.१९ लाख (रुपये नव्याण्णव कोटी एकोणीस हजार फक्त) इतक्या निधीस प्रशासकीय मान्यता दिली असून केंद्र हिश्श्याचा पहिला हप्ता म्हणून रु.४४५५.०९ लक्ष (रुपये चव्वेचाळीस कोटी पंचावन्न लक्ष नऊ हजार फक्त) निधी मुक्त केला आहे. कृषि विभागाच्या अधिनस्त येणा-या योजनांना आवश्यक प्रचार-प्रसिध्दी, विविध पातळीवरील क्षेत्रीय यंत्रणेशी समन्वय, अंमलबजावणीच्या काळातील आर्थिक व भौतिक प्रगतीचा आढावा घेण्यासाठी बैठक, पत्रव्यवहार व तद्अनुषंगिक बाबी इत्यादी आकस्मिक बाबींवरील खर्च भागविण्यासाठी केंद्र शासनाने पहिला हप्ता म्हणून वितरीत केलेल्या अनुदानातून रु.९.५९ लक्ष (रुपये नऊ लाख एकोणसाठ हजार फक्त) निधी संदर्भाधिन दिनांक १० ऑगस्ट, २०१० च्या शासन निर्णय अन्वये उपलब्ध करण्यात आला आहे.आता उर्वरीत रु.३१९.६७ हजार (तीन लक्ष एकोणीस हजार सदुसष्ट फक्त ) च्या निधीस प्रशासकीय आणि वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत योजनांच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी केंद्र शासनाने कृती आराखडया अंतर्गत सन २०१०-११ करिता पहिल्या हप्त्याचा निधी वितरित केल्यानुसार आकस्मिक खर्च भागविण्यासाठी संदर्भाधीन क्रमांक १ व २ अन्वये दिलेल्या प्रशासकीय व वित्तीय मान्यतेच्या अधिन राहून रु.३१९.६७ हजार (रुपये तीन लाख एकोणीस हजार सदुसष्ट फक्त) निधीच्या कार्यक्रमास राज्य शासनाची **प्रशासकीय** आणि **वित्तीय** मान्यता देण्यात येत आहे.

२. आकस्मिक खर्चाच्या बाबींसाठी म्हणून मंजूर केलेला निधी रु.३१९.६७ हजार (रुपये तीन लाख एकोणीस हजार सदुसष्ट फक्त) हा योजनांच्या प्रचार-प्रसिध्दी, विविध पातळीवरील क्षेत्रिय यंत्रणेशी समन्वय, अंमलबजावणीच्या काळातील आर्थिक व भौतिक प्रगतीचा आढावा घेण्यासाठी बैठका, पत्रव्यवहार व तदअनुंषंगिक बाबींवरील खर्च इ. बाबीवरील खर्च भागविण्यासाठी करण्यात यावा व तो खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**राज्य हिस्सा**

**मागणी क्र.डी-३**
**२४०१, पीक संवर्धन,**
**१०९, विस्तार व प्रशिक्षण,**
**(०१)(३०) कृषि विस्तारासाठी माहितीचे सहाय्य,**
**(२४०१ ३७२५)**

**३.** हा मंजूर केलेला निधी खर्च करण्यास तसेच जिल्हानिहाय निधी वितरण करण्यास **संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन, ) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे** यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. मंजूर बाबीवरील खर्च मासिक कॅशफ्लोच्या मर्यादेत राहील याची दक्षता घेण्याची तसेच संगणकीय अर्थसंकल्पिय प्रणालीद्वारे (BDS) वितरण करण्याची जबाबदारी **संचालक,( कृषि प्रक्रिया व नियोजन,) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे, यांची राहील.**

४. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १५३/१०/व्यय-१, दि.१७ जुलै, २०१० अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार व अपर मुख्य सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१००९२८२०४६५९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

**[वीणा राऊत]**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र राज्य**

**प्रति,**

आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे-१,
संचालक, कृषि प्रक्रिया व नियोजन, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती)
सर्व संचालक/ सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
विभागीय कृषी सह संचालक (सर्व),
जिल्हाधिकारी (सर्व), बृहन्मुंबई व मुंबई उपनगर हे जिल्हे वगळून,
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व), बृहन्मुंबई व मुंबई उपनगर हे जिल्हे वगळून,
जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व), बृहन्मुंबई व मुंबई उपनगर हे जिल्हे वगळून,
जिल्हा अधिक्षक, कृषि अधिकारी (सर्व),
सर्व मुख्य वित्त व लेखा अधिकारी (जिल्हा परिषद),
सर्व कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद
महालेखापाल-१, महाराष्ट्र (लेखा परिक्षा/ लेखा अनुज्ञेयता), मुंबई
महालेखापाल-२, महाराष्ट (लेखा परिक्षा/ लेखा अनुज्ञेयता), नागपूर
कोषागार अधिकारी (सर्व),
माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मंत्रालय,
वित्त विभाग, नियोजन विभाग, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रती),
सर्व कक्ष अधिकारी (कृषि), कृषि व पदुम विभाग,
मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
निवड नस्ती कार्यासन ३-अे.